सन २०१८-१९ करिता आदिम जमाती विकास योजनेअंतर्गत “महाराष्ट्रातील आदिम जमाती (माडिया, कोलाम, कातकरी) समूहाच्या समावेशक विकासासाठी ६० ग्रामसाथींची नियुक्ती व प्रशिक्षण कार्यक्रम” या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१८/प्र.क्र.१५४/का-१९**

**मंत्रालय, मुंबई ४०००३२**

**तारीख: २९/०१/२०१९**

**संदर्भ-**

१) जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०४(१४)/२०१८-Grants, दि.२१/०६/२०१८

२) जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०५(१०)/२०१८-Grants/PVTG, दि.२१/१२/२०१८

३) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रिय-२०१८/प्र.क्र.६९/का.१९,दि.१०.०१.२०१९

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाकडून विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत अनुदान , भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत व अदिम जमाती विकास कार्यक्रम या योजनाअंतर्गत राज्य शासनास अनुदान प्रदान होत असते . राज्यात सद्य स्थितीला कोलाम, कातकरी आणि माडिया हे तीन आदिम जमाती (माडिया, कोलाम, कातकरी) समूह आहेत. ह्या जन जाती विकासाच्या मूळ प्रवाहांपासून दूर आहेत तसेच इतर जन जातींच्या तुलनेत आर्थिक आणि सामाजिक बाबीत पिछाडीवर आहेत. सदर जनजाती समोर सांस्कृतिक विघटनाचा धोका आहे तसेच ह्या जन जातींमध्ये विकासाच्या मुख्य प्रवाहातून वगळले गेल्याची भावना आहे, अश्या परीस्थितीत ह्या जन समूहांमधून सर्व समावेशक विकास जलद रीतीने घडवून आणण्यासाठी शासनाशी जोडल्या गेलेल्या युवक आणि युवतींचे जाळे निर्माण करणे आवश्यक आहे. ह्या जाळ्यातून विकासासाठी आवश्यक असे सामाजिक भांडवल निर्माण करावे लागेल. हा दृष्टीकोन समोर ठेवून “Building social capital through training and nurturing ६० youth leaders (Gram saathis ) २० each from ३ PVTG communities” या योजनेसाठी १३५.६० लक्ष रुपये किमतीचा प्रस्ताव केंद्र शासनास मंजुरीसाठी पाठविला होता .

२. जनजाती कार्य मंत्रालयाने दि.२३.०५.२०१८ रोजी आयोजित केलेल्या Project Appraisal Committee (PAC) बैठकीमध्ये “Building social capital through training and nurturing ६० youth leaders (Gram saathis ) २० each from ३ PVTG communities” ही योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्यासाठी एकून १३५.६० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास संदर्भाधिन पत्रान्वये मंजुरी दिली सदर निधी पत्र क्र.२ अन्वये शासनास प्राप्त झालेला आहे. संदर्भाधिन शासन निर्णय क्र.३ अन्वये सदर निधी आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना वितरित करण्यात आलेला आहे.

३. आदिवासी विकास विभागाच्या विविध योजना राबविण्यासंदर्भात आदिवासी विकास विभाग व मुंबई विद्यापीठ यांच्यात सामांजस्य करार(MoU) करण्यात आलेला आहे. त्यानुसार हि योजना मुंबई विद्यापीठाच्या अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था ह्या विभागामार्फत राबविण्याचे प्रस्तावित आहे . सबब, आदिम जमाती (माडिया, कोलाम, कातकरी) समूहाच्या सहभागी पद्धतीने विकास घडवून आणण्याचा कार्यक्रमाच्या अंतर्गत "महाराष्ट्रातील आदिम जमाती समूहाच्या सर्व समावेशक विकासासाठी ६० PVTG युवक/युवतींना प्रशिक्षण देऊन नेतृत्व बांधणी आणि सामाजिक भांडवल तयार करणे" हि योजना मुंबई विद्यापीठाच्या अर्थशास्त्र व सामाजिक धोरण संस्था ह्या संस्थेमार्फत राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय-</u>**

आदिम जमाती (माडिया, कोलाम, कातकरी) समूहाच्या सहभागी पद्धतीने विकासाच्या प्रवाहात आणणे आणि विकासाच्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या कार्यक्रमार्तगत "महाराष्ट्रातील आदिम जमाती समूहाच्या सर्व समावेशक विकासासाठी ६० PVTG युवक/युवतींना प्रशिक्षण देऊन नेतृत्व बांधणी आणि सामाजिक भांडवल तयार करणे" ही योजना मुंबई विद्यापीठाच्या अर्थशास्त्र व सार्वजनिक धोरण संस्था व आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत संयुक्तपणे राबविण्यासाठी एकुण रु. १३५.६० लक्ष किंमतीच्या अंमलबजावणी मार्गदर्शक सूचनांना या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक-१ नुसार मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांनी करावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१७०२२८७१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Shivaji Jadhav

Digitally signed by Santosh Shivaji Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f635bf4a671627c02b82e6a01acb4a38afc24f58a5534a9d1271fe258a564b0, serialNumber=b8ee819ccc335cea98640b72c63671dd013899d3601f09ce4ea340e1741652a0, cn=Santosh Shivaji Jadhav
Date: 2019.01.29 17:14:38 +05'30'

**( संतोष जाधव )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१) मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. प्रधान सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४) आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
५) आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे.
६) सहसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

७) उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे, नाशिक,अमरावती,नागपूर.

९) प्रकल्प अधिकारी सर्व , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

१०) संचालक, मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई

११) संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

१२) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

## आदिम जमाती विकास कार्यक्रमा अंतर्गत मंजूर योजना- सन २०१८-१९

**परिशिष्ट-१** **(रुपये लाखात)**

<table>
<tr><td>.१</td><td>योजनेचे नाव</td><td>“महाराष्ट्रातील PVTG (माडिया, कोलाम, कातकरी) च्या सर्वसमावेशक विकासासाठी सदर समूहातीलएकूण ६० युवक-/युवतींना प्रशिक्षण देऊन नेतृत्व बांधणी करणे”<br>( Building social capital through training and nurturing ६० youth leaders (Gram saathis ) २० each from ३ PVTG communities)</td></tr>
<tr><td>२.</td><td>योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र</td><td>माडिया, कोलाम आणि कातकरी यांची लोकसंख्या जास्त असलेले सर्व जिल्हे - गडचिरोली, यवतमाळ, चंद्रपूर, नांदेड, ठाणे, पालघर, रायगड, इ</td></tr>
<tr><td>३.</td><td>वित्तीय तरतूद</td><td>
<table>
<tr><th>अक्र.</th><th>वर्ष</th><th>योजना</th><th>निधी (रू.लक्ष)</th></tr>
<tr><td>१</td><td>२०१८-१९</td><td>Building social capital through training and nurturing ६०youth leaders (Gram saathis ) from ३ PVTG communities</td><td>१३५.६०</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>४.</td><td>या योजनेत येणारे खर्चाचे अंदाजपत्रक</td><td>एकूण खर्च -रु.१३५.६० लक्ष
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाब</th><th>संख्या</th><th>मासिक खर्च (रु)</th><th>प्रथम वर्षासाठी एकूण खर्च (रु)</th><th>द्वितीय वर्षासाठी एकूण खर्च (रु)</th><th>एकूण खर्च (रु)</th></tr>
<tr><td>१</td><td>ग्रामसाथी</td><td>६०</td><td>९,०००</td><td>६४,८०,०००</td><td>६४,८०,०००</td><td>१,२९,६०,०००</td></tr>
<tr><td>२</td><td>ग्राम साथींचे प्रशिक्षण</td><td>६०</td><td></td><td>२,००,०००</td><td>१,००,०००</td><td>३,००,०००</td></tr>
<tr><td>३</td><td>प्रवास खर्च</td><td>६०</td><td></td><td>१,५०,०००</td><td>१,५०,०००</td><td>३,००,०००</td></tr>
<tr><td></td><td>एकूण खर्च</td><td></td><td></td><td></td><td></td><td>१,३५,६०,०००</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>५.</td><td>योजना राबवणारी यंत्रणा</td><td>आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे व<br>मुंबई अर्थशास्त्र आणि सार्वजनिक धोरण संस्था, मुंबई विद्यापीठ</td></tr>
<tr><td>६.</td><td>नियंत्रक अधिकारी</td><td>आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे, व प्रकल्पासाठी गठीत केलेली समूह निहाय समन्वयक समिती.</td></tr>
<tr><td>७</td><td>योजनेचा उद्देश/ हेतु</td><td>➢ PVTG (माडिया, कोलाम, कातकरी) समूहांमध्ये सामाजिक भांडवल आणि नेतृत्व उभे राहील अशी योजना करणे.<br>➢ या ६० ग्रामसाथींच्या माध्यमातून माडिया, कोलाम आणि कातकरीसाठीच्या योजना गाव पातळीवर प्रभावीपणे राबवणे.<br>➢ ग्रामसाथींच्या माध्यमातून या समूहांशी सवांद साधून त्यांच्या समस्या, गरजा आणि विकासाच्या कल्पना समजून घेणे.</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| ८ | **योजना अंमलबजावणी ची कार्यपध्दती** | ➢ सदर योजना राबविण्याबाबतचे सविस्तर अंदाजपत्रक व वर्षनिहाय कालबद्ध कार्यक्रम निश्चित केल्यानुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संयुक्तपणे आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था व योजना राबविणाऱ्या यंत्रणेचीराहील.<br>➢ योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने लागणारे मनुष्यबळ व त्यांची निवड करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.<br>➢ नेतृत्व बांधणीच्या दृष्टीने प्रत्येक PVTG समूहातून, लोकसंखेच्या अनुषंगाने आणि भौगोलिक परिस्थिती लक्षात घेता एकूण ६० व्यक्तींची ग्रामसाथी म्हणून नेमणूक करण्यात येईल. त्यानुसार कातकरीसाठी ३५ ग्रामसाथी, कोलामासाठी १५ ग्रामसाथी आणि माडियासाठी १० ग्रामसाथी नेमण्यात येतील.<br>➢ या शिवाय माडिया व कोलाम यांच्यासाठी प्रत्येकी एक क्षेत्र समन्वयक आणि कातकरी समूहासाठी दोन क्षेत्र समन्वयक आदिम जमातीसाठी धोरण निर्मिती॰या प्रकल्पांतर्गत नेमण्यात येतील. ग्रामसाथी सदर क्षेत्र समन्वयकाच्या मार्गदर्शनाखाली काम करतील.<br>➢ सदर नेमणूक अंमल बजावणी यंत्रणा मुंबई विद्यापीठ, समन्वयक समिती व सबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या सहकार्याने करतील.<br>➢ आदिवासी संशोधन आणि विकास संस्थेच्या (TRTI) क्वेस्ट कार्यालय येथे PVTG कक्ष निर्माण करण्यात येईल, ग्रामसाथी या कक्षाशी जोडले जातील.<br>➢ ग्राम साथीची किमान शैक्षणिक अर्हता १२ वी उतीर्ण असेल आणि सदर व्यक्ती विविध स्तरावर PVTG समूहाशी समाज कार्याद्वारे पूर्वीपासून जोडलेली असेल.<br>➢ याशिवाय मार्गदर्शनासाठी आणि संनियंत्रणासाठी समूह निहाय समन्वयक समिती गठीत केली जाईल.<br>➢ सदर प्रकल्पाच्या उदिष्टपूर्तीसाठी आवश्यक उपक्रमांची निश्चिती योजना राबवणारी संस्था करेल.<br>**ग्राम साथीची कार्ये आणि कर्तव्य पुढील प्रमाणे असतील**-<br>➢ समूह निहाय समन्वयक समिती आणि क्षेत्र समन्वयक पदावरील व्यक्तीच्या मार्गदर्शनाखाली प्रत्येक ग्रामसाथीला काही विशिष्ट संख्येने पाडे/गावे/ वस्त्या जोडून दिल्या जातील. त्यानुसार नेमून दिलेल्या पाडे/गावे/ वस्त्यातून त्या त्या समूहांच्या विकासासाठी काम करणे<br>➢ नेमून दिलेल्या गावांतून समन्वयकाच्या सूचनेप्रमाणे आवश्यक ती माहिती गोळा करणे.<br>➢ शासनाच्या विविध योजनांची माहिती नेमून दिलेल्या गावाना पोहोचवणे आणि अंमलबजावणीतील अडथळे दूर करणे. |

| | | |
|---|---|---|
| | | ➢ नेमून दिलेल्या गावातून दर महिन्याला विकासाच्या समस्यांविषयी आणि विविध शासकीय योजनाच्या अंमलबजावणी विषयी अहवाल क्षेत्र समन्वयकास सादर करणे.<br>➢ क्षेत्र समन्वयकाने नेमून दिलेली इतर कामे करणे.<br>➢ ग्रामसाथीची नेमणूक दोन वर्षासाठी असेल आणि दर तीन महिन्यांनी समूह निहाय समन्वयक समितीकडून ग्रामसाथीच्या कामाचा आढावा अहवाल समूह निहाय समन्वय समितीकडेक्षेत्र समन्वयकाच्या माध्यमातून पोहचविल्या जाईल.<br>➢ ग्रामसाथीचे सलग दोन आढावामध्ये अहवाल असमाधानकारक असल्यास समूह निहाय समन्वय समिती ग्राम साथीस पदमुक्त करून नवीन ग्राम साथीची नेमणूक करू शकेल.<br>➢ ग्रामसाथी पदासाठी एकत्रित मासिक मानधन रु.९००० देय असेल.<br>**ग्रामसाथी पदासाठी खालीलप्रमाणे शैक्षणिक आणि इतर अर्हता असेल**:<br>१) किमान बारावी पर्यंत शिक्षण<br>२) PVTG (माडिया, कोलाम, कातकरी) समूहांमध्ये काम करण्याचा किमान १ वर्ष अनुभव<br>३) वय: किमान १८ वर्ष, कमाल ३५ वर्ष.<br>४) मासिक मानधन रुपये ९,००० देय असेल.<br>**योजना अंमलबजावणी कार्य पद्धती आणि कालबद्ध कार्यक्रम खालील प्रमाणे असेल**<br>• **फेब्रुवारी २०१९:** ग्रामसाथी नेमणूक आणि प्रशिक्षण<br>• जून २०१९: समूह निहाय समन्वयक समितीची आढावा बैठक<br>• ऑक्टोबर २०१८: ग्रामसाथी आणि समूह निहाय समन्वयक समितीची आदिवासी संशोधन आणि प्रशिक्षण येथे आढावा बैठक.<br>• **फेब्रुवारी २०२०:** गरजेनुसार ग्रामसाथीचे पुन:प्रशिक्षण (Refresher Training)<br>• जून २०२०: समूह निहाय समन्वयक समितीची आढावा बैठक<br>• ऑक्टोबर २०२०: ग्रामसाथी आणि समूह निहाय समन्वयक समितीची आदिवासी संशोधन आणि प्रशिक्षण येथे आढावा बैठक.<br><br>**प्रशिक्षणानंतर ग्रामसाथी नेमून दिलेल्या गावांमध्ये क्षेत्र समन्वयक आणि प्रकल्प अधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली काम सुरु करतील** |
| ९ | **समूह निहाय समन्वयन समिती** | प्रत्येक विशेष असुरक्षित आदिवासी गटासाठी खालीलप्रमाणे समन्वयन समिती गठीत करण्यात येत आहे:<br>**माडिया गोंड:**<br>१. अप्पर आयुक्त,आदिवासी विकास, नागपूर ( अध्यक्ष)<br>२. संबंधित प्रकल्प अधिकारी<br>३. QUEST कार्यालयात कार्यरत असलेला/ली समन्वयक व्यक्ती |

| | | |
|---|---|---|
| | | ४. माडिया समाजासाठी नियुक्त केलेली क्षेत्र समन्वयक ह्या पदावर कार्यरत असलेली व्यक्ती ( सदस्य सचिव)<br>**कोलाम :**<br>१. अप्पर आयुक्त,आदिवासी विकास, अमरावती ( अध्यक्ष)<br>२. संबंधित प्रकल्प अधिकारी<br>३. QUEST कार्यालयात कार्यरत असलेला/ली समन्वयक व्यक्ती<br>४. कोलाम समाजासाठी नियुक्त केलेली क्षेत्र समन्वयक ह्या पदावर कार्यरत असलेली व्यक्ती ( सदस्य सचिव)<br>**कातकरी :**<br>१. अप्पर आयुक्त,आदिवासी विभाग, ठाणे ( अध्यक्ष)<br>२. संबंधित प्रकल्प अधिकारी<br>३. QUEST कार्यालयात कार्यरत असलेला/ली समन्वयक व्यक्ती<br>४. कातकरी समाजासाठी नियुक्त केलेली क्षेत्र समन्वयक ह्या पदावर कार्यरत असलेली व्यक्ती ( सदस्य सचिव)<br>**समन्वयन समितीचे कार्ये-**<br>➢ विशेष असुरक्षित आदिम समाजाच्या विषयी सध्या अस्तित्वात असलेल्या योजनांच्या अंमलबजावणीचा नियमित आढावा घेणे व त्यामधील त्रुटी दूर करणे .<br>➢ विशेष असुरक्षित आदिम जमातीच्या सर्वांगीण विकासासाठी नवीन उपाययोजना सुचविणे.<br>➢ योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने करण्यात येणारी कार्ये व त्यांची प्रगती याबाबतचा अहवाल सादर करण्याची जबाबदारी उपरोक्त समितीची असेल.<br>➢ सदर समितीची बैठक ३ महिन्यांतून एकदा होईल. |
| १० | **योजनेची अंमलबजावणी चा कालावधी** | एकून कालावधी - सदर शासन निर्णय निर्गमित झाल्या पासून पुढील २ वर्ष |
| ११ | **निधी वितरणाची कार्य पद्धती** | सदर योजनेकरिता निधी वितरणाची कार्यपद्धती खालील प्रकारे निश्चित करण्यात येत आहे.<br>१. सदर योजनेचा निधी हा आदिवासी विकास विभागामार्फत आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे (TRTI) यांना वर्ग करण्यात करण्यात येईल.<br>२. सदर निधी प्राप्त होताच आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे (TRTI) हे अंमल बजावणी यंत्रनेला कार्याचा आदेश देऊन प्रकल्पाच्या सुरुवातीला २५ टक्के निधी वर्ग करतील .<br>३. सदर निधी प्राप्त होताच व कार्यारंभ आदेश मिळाल्यानंतर अंमलबजावणी यंत्रणा प्रत्यक्षात कार्यास सुरुवात करेल . |

| | | |
|---|---|---|
| | | ४. प्रत्यक्ष कार्य सुरु होऊन ६ महिने झाल्यानंतर व कामाच्या प्रगतीनुसार व समूह निहाय समन्वयक समितीच्या अहवालानुसार व समाधान कारक शिफारस केल्यानंतर पुढील २५ टक्के निधी वर्ग करण्यात येईल.<br>५. प्रथम वर्षीचा कालावधी संपल्या नंतर समूह निहाय समन्वयक समितीच्या अहवालानुसार व समाधानकारक शिफारस केल्या नंतर पुढील ३० टक्के रक्कम अंमलबजावणी यंत्रणेस वितरीत करण्यात येईल<br>६. उर्वरित २० टक्के निधी सबंधित यंत्रणेस कार्य पूर्ण झाल्या नंतर व आवश्यक असलेले कार्यपूर्णता प्रमाणपत्र दिल्या नंतर वर्ग करण्यात येईल .<br>७. योजनेच्या अनुषंगाने आऊट सोर्सिंग करण्यात येणारे कर्मचारी यांचे मानधन देण्याची संपूर्ण जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील .<br>८. योजनेच्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल ( कर्मचाऱ्यांचे मानधन , प्रवास , भोजन व इतर खर्च , सभेचा खर्च तसेच इतर तत्सम खर्च ) वेळोवेळी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था यांना सादर करण्याची जबाबदारी अंमल बजावणी यंत्रणेची राहील . |
| १२ | **योजनेची फलनिष्पती** | ➢ PVTG (माडिया, कोलाम, कातकरी) समूहांमतील युवक-युवतीमध्ये नेतृत्व बांधणी करून त्यांच्यामार्फत ग्रामसभांना सक्षम करणे.<br>➢ ग्रामसाथीमार्फत विकासाच्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करणे.<br>➢ वनहक्क कायदा आणि पेसाकायद्यासारख्या कायद्यांबाबत जनजागृती करून अंमलबजावणी करणे. |